जीवास धोका असल्याच्या तक्रार प्रकरणी
पोलीसांनी करावयाच्या कारवाईबाबत मार्गदर्शक
सूचना .

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग (विशेष),
परिपत्रक क्र.एसएसए -१०/२०००/१/विशा-४.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांक ३ जानेवारी २०००.

वाचा :- १) परिपत्रक क्र.डीआयएस-०३८८/९०९९/विशा-१(अ),दिनांक ९ ऑगस्ट १९९०.
२) परिपत्रक क्र.एमआयएस-०४९७/का.व सु./प्र.क्र.१९/विशा-१अ.दिनांक १२मे१९९७.
३) परिपत्रक क्र. पीआरटी ०७९९/५६:पोल-१२,दिनांक २७ जुलै १९९९.
४) परिपत्रक क्र. एमआयएस ०४९७/का.व सु./प्र.क्र.१९/विशा१-अ,दि.११ऑक्टो.९९.

**परिपत्रक**

उपरोक्त विषयाबाबत वरील शासन परिपत्रकाअन्वये प्रस्तुत करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचना अधिक्रमीत करुन खालीलप्रमाणे शासन आदेश देत आहे.

ब-याच व्यक्ती त्यांच्या जीवाला धोका असल्याची तक्रार पोलीसांकडे विविध कारणे सांगून करतात. कधी कधी अशा व्यक्ती एखाद्या टोळीशी संबंधित गुन्हेगारही असण्याची शक्यता असते. अशा गुन्हेगारी व्यक्तींना नजरेत भरेल असे पूर्ण संरक्षण देतांना पोलीसांची स्थिती विचित्र होते. कारण,त्यांच्यावर अशा वेळी ते त्या व्यक्तीच्या बेकायदेशीर कृत्यांना संरक्षण देतात, अशा प्रकारची टिका वा आरोप केले जातात. काही व्यक्ती काही किरकोळ कारणांवरुन झालेल्या भांडणावरुनही पोलीस संरक्षणाची मागणी करतात. तसेच,बरेच वेळा पोलीस संरक्षण ही प्रतिष्ठेची बाब समजून क्षुल्लक कारणावरुन सुध्दा मागितले जाते. क्वचित प्रसंगीच पोलीस संरक्षणाची मागणी करणा-या व्यक्तीच्या जीवाला खरोखर धोका असतो हया सर्व कारणांमुळे पोलीसांना प्रत्येक प्रकरणी संरक्षण द्यावे किंवा कसे व द्यावयाचे झाल्यास कोणत्या मर्यादेपर्यन्त याचा निर्णय घेणे कठीण होते. हया सर्व बाबींचा साकल्याने



शामनु-रोटा-युधि-एच-1066(250-1-2001)1.

विचार करुन शासन असे आदेश देत आहे की, जीवास धोका असल्याच्या तक्रार प्रकरणी कारवाई करतांना पोलीसांनी पुढील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा:-

(१) पोलीस सुरक्षेकडे प्रतिष्ठेचे चिन्ह म्हणून पाहण्यात येऊ नये. सर्वसाधारणत: जीवाला धोका असल्याची तक्रार मिळाल्यावर अशा व्यक्तीला समक्ष बोलावून त्याची तक्रार काय आहे, कोणाकडून धोका आहे, धोक्याचे स्वरूप काय आहे याबाबत प्राथमिक चौकशी तात्काळ करावी. प्रथमदर्शनी यामध्ये तथ्य असल्यास पोलीसांनी संबंधित व्यक्तीस तात्काळ संरक्षण द्यावे व त्याबाबत आवश्यक ती तपशीलवार चौकशी सुरु करावी. ही चौकशी पूर्ण झाल्यानंतर व संबंधित व्यक्तीचा संरक्षण मागण्यामागील उद्देश व त्याल असलेल्या धोक्याचे स्वरुप याबाबतचे चित्र स्पष्ट झाल्यानंतरच संरक्षण पुढे चालू ठेवावे, दूर करावे वा काढून घ्यावे याचा निर्णय पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक यांना घ्यावा. तसे करतांना संबंधित व्यक्तीच्या संरक्षणार्थ आवश्यक त्या प्रमाणात सुरक्षा अधिकारी निवासस्थानी नेमण्याबाबतही योग्य तो निर्णय घ्यावा.

(२) ज्या व्यक्तीच्या बाबतीत गुन्हेगारी कृत्यांची नोंद नाही त्या व्यक्तीचा जीव धोक्यात असल्यामुळे संरक्षण देण्याच्या विनंतीस जास्त महत्व दिले पाहिजे व त्या व्यक्तीच्या संरक्षण मागण्यामागील इतर हेतूकडे दुर्लक्ष केले पाहिजे.

(३) गुन्हेगारी कृत्याची नोंद असलेली व्यक्ती स्वत:च्या कृत्यामुळे जीवावरील धोक्यास निमंत्रण देते. सामान्यत: अशा व्यक्तीची स्वसंरक्षणाची कुवत असते. त्यामुळे अशा स्वरुपाचे गुंड, गुन्हेगारी कृत्याची नोंद असलेल्या व्यक्तीला त्यांनी मागणी केली तरीही पोलीस संरक्षण देण्याची आवश्यकता नाही कारण की अशी व्यक्ती पुरविण्यात येणा-या पोलीस संरक्षणाचा दुरुपयोग स्वत:चा फायदा व गुन्हेगारी कृत्य करण्याकरिता करु शकते.

(४) गुन्हेगारी कृत्याची नोंद असलेल्या खासदार/आमदार वा अन्य लोकप्रतिनिधी यांना पोलीस संरक्षण उपलब्ध करुन द्यावे किंवा कसे याबाबत काही पोलीस घटकांकडून शासनास विचारणा करण्यात आली आहे. सदर बाब विचारात घेऊन असे स्पष्ट करण्यात येते की, गुन्हेगारी कृत्याची नोंद असलेल्या खासदार/आमदार वा अन्य लोकप्रतिनिधी यानाही पोलीस संरक्षण उपलब्ध करुन देण्यात यावे, तथापि, विशिष्ट प्रकरणी अशा आमदार/खासदार /लोकप्रतिनिधी यांना दिलेले पोलीस संरक्षण काढून घ्यायचे असल्यास त्याप्रमाणे शासनास प्रस्ताव सादर करुन शासनाची मान्यता घेण्यात यावी.

(५) गुन्हेगारी कृत्याची नोंद असलेल्या व्यक्तीस संरक्षण देण्याबाबत वरील (३) मध्ये नमूद केले आहे. असे असले तरी त्यांनी विशिष्ट प्रसंगी अथवा विशिष्ट ठिकाणी जिवीतास खरोखर व तात्काळ



एच-1066(250-1-2001)1-अ.

धोका आहे असे संबंधित अधिका-यास पटवून दिल्यास त्या प्रसंगी अथवा ठिकाणी तेवढ्यापुरते संरक्षण देण्यात यावे.

(६) संरक्षण मागणा-या व्यक्तींनी गुन्हेगारी कृत्यांची नोंद असलेल्या प्रतिस्पर्धी पक्षाकडून धोका असल्याची धास्ती व्यक्त केल्यास, अशा बाबींस संरक्षण देण्याच्या दृष्टीने जास्त महत्व द्यावे. तसेच, त्यामुळे किती प्रमाणात पोलीस संरक्षण पुरवावे लागेल याचाही अंदाज येईल.

(७) प्रतिस्पर्धी पक्षाच्या बाबतीत गुन्हेगारी कृत्याची नोंद नसल्यास पोलीस संरक्षण थोडया काळापुरतेच देण्यात यावे.

(८) संरक्षणार्थ द्यावयाचे पोलीस, पोलीस ठाण्यातून न देता ते नेहमी मुख्यालयातून दिले जावेत. कारण पोलीस ठाण्यात अनेक कामांसाठी मनुष्यबळाची सतत आवश्यकता असते.

(९)पोलीस संरक्षण देण्याच्या बाबतीत अंतिम निर्णय घेतांना संरक्षण मागणा-या व्यक्तीच्या दर्जास कोणत्याही प्रकारे महत्व देण्यात येऊ नये. धोक्याचे स्वरुप लक्षात घेऊनच किती प्रमाणात संरक्षण द्यावे याचा निर्णय पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक यांनी घ्यावा.

(१०) एखाद्याच्या जीवास खरोखरच धोका असल्यामुळे त्याला पोलीस संरक्षण देण्याचा निर्णय घेतल्यानंतर पोलीसांनी किती प्रमाणात संरक्षण द्यावे याबाबत त्या व्यक्तीचा सल्ला पोलीसांनी मानू नये. तसेच, त्याची इच्छा असो किंवा नसो तो जेथे जाईल तेथे तेथे पोलीसांनी त्याच्या बरोबर जावे. तसेच, त्याने जर पोलीसांना त्याच्या आगामी कार्यक्रमांबाबत सूचना दिली नाही वा पोलीसांच्या अन्य कोणत्याही सूचनेचे पालन केले नाही तर त्याला समज देण्यात यावी की, तो त्यामुळे संकटास निमंत्रण देत आहे व त्यावर त्यांच्याकडून लेखी पोच घेण्यात यावी. यांनी पुनरावृत्ती झाल्यास शासनास अहवाल पाठवावा व त्या व्यक्तीचे संरक्षण काढून घेण्याचा प्रस्ताव शासनास पाठवावा व शासनाचे मान्यतेने त्या व्यक्तिचे संरक्षण काढून टाकावे.

(११) ज्या पोलीस अधिकारी यांनी स्वतःचे स्तरावर पोलीस संरक्षण देण्याचे आदेश काढले आहेत त्याबाबत त्यांनी येणा-या धमक्यांचे स्वरुप बदलले आहे, किंवा कमी झाले आहे इ. बाबतची तपासणी वेळोवेळी परंतु जास्तीत जास्त दर तीन महिन्यांनी करुन सतत आढावा घ्यावा व संरक्षण देणे आवश्यक नाही असे वाटल्यास संरक्षण काढून घेण्यात यावे.

(१२) ज्या प्रकरणी वरिष्ठ अधिका-याकडून संरक्षण देण्याबाबत आदेश झाले आहेत त्याबाबत धमक्याचे स्वरूप बदलले आहे किंवा कमी झाले आहे इ. बाबतची तपासणी वेळोवेळी परंतु जास्तीत जास्त दर तीन महिन्यांनी तपासणी करुन वरिष्ठ अधिका-यांकडे संदर्भ करावा व यावर वरिष्ठ अधिकारी यांनी तात्काळ निर्णय घेऊन तसा निर्णय लेखी कळवावा.



एम-1066(250-I-2001)2.

(१३) ज्या प्रकरणी शासनाने आदेश दिलेले आहेत त्या प्रकरणी धमक्याचे स्वरुप बदलले/कमी झाले आहे का इत्यादि बाबतची तपासणी वेळोवेळी परंतु जास्तीत जास्त दर दोन महिन्यांनी तपासणी करुन संरक्षण पुढे चालू ठेवण्याची आवश्यकता नसेल तर तसा अहवाल शासनास सादर करुन शासनाचे आदेश घ्यावेत.

(१४) राज्यामध्ये काही ठिकाणी आवश्यक नसतांना संरक्षण दिले जाते व जेवढे आवश्यक आहे, त्यापेक्षा अवाजवी प्रमाणात संरक्षण दिले जाते. याचे दाखले देऊन राज्यामध्ये इतरत्रही तशा प्रमाणात संरक्षण द्यावे, असा आग्रह संरक्षित व्यक्ती करतात. यामध्ये राज्यभर सुसूत्रता रहावी, व आवश्यक तेथेच आवश्यक प्रमाणात व योग्य कारणासाठी संरक्षण दिले जाते काय हे तपासणी करण्याची आवश्यकता आहे. यासाठी पोलीस महासंचालक यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येत आहे. याची रचना पुढील प्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई. | -- अध्यक्ष. |
| आयुक्त व विशेष पोलीस महानिरीक्षक. | -- सदस्य. |
| गुन्हा अन्वेषण विभाग,(गुप्तवार्ता),महाराष्ट्र राज्य,मुंबई. | |
| पोलीस उपमहानिरीक्षक (संबंधित परिक्षेत्र) | -- सदस्य. |
| संबंधित पोलीस आयुक्त अथवा प्रतिनिधी. | -- सदस्य. |
| संबंधित पोलीस अधीक्षक | -- सदस्य. |

सदर समिती दर तीन महिन्यानी पोलीस आयुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी त्यांचे स्तरावर ज्या व्यक्तींना संरक्षण दिले आहे त्याचा आढावा घेईल. व संरक्षण वाढविणे वा कमी करणे वा काढून टाकणे यांवर संबंधित पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक यांना सूचना देतील.

(१५) मुंबई पोलीस अधिनियम १९५१ च्या कलम ४७ प्रमाणे विनंती अर्जावरुन दिलेल्या संरक्षणाचा खर्च वसूल करण्यात यावा अशी तरतूद आहे. याबाबत खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

(अ) खासदार/आमदार व इतर लोकप्रतिनिधी यांना लोकप्रतिनिधी म्हणून कामकाजासंदर्भात दिलेल्या संरक्षणासाठी रक्कम आकारण्यात येऊ नये.

(ब) शासकीय सेवेत/निमशासकीय सेवेत तसेच राज्य शासनाच्या महामंडळातील अधिकारी/कर्मचा-यांना नेमून दिलेल्या कामासंदर्भाने संरक्षण दिले असल्यास त्याबाबतचा खर्च वसूल करण्यात येऊ नये. त्यांच्या कामकाजाचा भाग सोडून अन्य प्रकरणामुळे संरक्षण द्यावे लागल्यास त्याबाबतचा खर्च वसूल करण्यात ययावा.

(क) संरक्षणाचा खर्च वसूल करतांना प्रत्येक पदाचे सरासरी वेतन खालील सूत्राप्रमाणे काढण्यात यावे.

(अे = एम+ (५/६ - एक्स/६०)x डी

अे= सरासरी वेतन

एम= वेतन श्रेणीतील कमीत कमी टप्पा

एक्स= वेतनश्रेणीतील वेतन वाढीचा काळ

डी= वेतनश्रेणीतील कमाल व किमान टप्प्यातील फरक.

या वेतना नुसार मिळणारा महागाईभत्ता/घरभाडेभत्ता/स्थानिक पूरक भत्ता/प्रवासभत्ता त्यामध्ये मिळवून एकुण वेतन काढण्यात यावे संबंधीत पोलीस कर्मचारी अधिकारी याच्या प्रशिक्षणावर झालेला खर्च तसेच त्याला मिळणारे अनुषंगीक लाभ लक्षात घेता एकूण वेतनामध्ये त्याच्या ५०% एवढी रक्कम मिळवून संरक्षणासाठी घ्यावयाची एकूण मासिक रक्कम काढण्यात यावी. एक दिवसाचे वेतन काढण्यासाठी ३० दिवसांचा महिना समजण्यात यावा. याशिवाय वाहन दिले असल्यास, वाहनाचा व वाहन चालकाचा खर्च वसूल करावा.

(ड) दर सहा महिन्यांनी महागाई भत्ता वाढतो हे लक्षात घेता प्रत्येक पदासाठी वरील (क) प्रमाणे घ्यावयाच्या संरक्षण खर्चाची पुर्ननिश्चिती दरवर्षी एकदा १ जुलै ला करावी व पूर्वीचे संरक्षण खर्चामध्ये ५% दरवर्षी वाढ करुन निश्चित करावी.

(इ) एक महिन्यांचा संरक्षणाचा खर्च आगाऊ रक्कम घेऊन नंतर संरक्षण देण्यात यावे.

वरील मार्गदर्शक सूचना सर्व संबंधित पोलीस अधिका-यांच्या व सर्व पोलीस ठाण्यांच्या निदर्शनास आणाव्यात व त्यांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( श्रीकांत देशपांडे )

उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग (विशेष)



एच-1066(250-1-2001)3.

प्रत:-

पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,मुंबई,

सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,

सर्व पोलीस आयुक्त,

सर्व पोलीस उपमहानिरीक्षक,

सर्व सहाय्यक पोलीस महानिरीक्षक,

सर्व पोलीस अधीक्षक,

गृह विभाग (पोल-१२,१३,विशा-१ब,विशा-१अ,विशा-६)

---



एच-1066(250-1-2001)3-अ